शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदुरबार या संस्थेसाठी मुलांच्या वसतिगृहाकरीता इमारत भाडयाने घेण्याकरीता करण्यात आलेल्या करारास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२१/प्र.क्र.२२७/२०२१**
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: १२ जून २०२३

वाचा:-

१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र.एमईडी-२०१०/प्र.क्र.७६ (अ)/२०१०/शिक्षण-१,दि. ३१.०१.२०१२

२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र.पदनि-१७१३/प्र.क्र.०७/१३/वैसेवा-२, दि. २०.११.२०२०

३) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र.पदनि-१७१३/प्र.क्र.०७/वैसेवा-२, दि. २७.०५.२०२१

४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०४.०३.२०२२.

५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण यांचे पत्र क्र. डीएमईआर-१२०११/३/२०२२ईडीयु, दि. ०३.०५.२०२३.

प्रस्तावना:-

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदुरबार या संस्थेतील प्रवेशित मुलांच्या वसतिगृहाकरीता खाजगी इमारत भाडेतत्वावर घेण्यास तसेच त्याकरिता रुपये १,२५,३८६/- मासिक एवढ्या भाड्यापोटी येणा-या खर्चास विभागाच्या संदर्भ क्र. ४ वरील दिनांक ०४.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तथापि सदर कराराची मुदत संपुष्टात आल्याने त्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदुरबार या संस्थेतील प्रवेशित मुलांच्या वसतिगृहाकरीता खाजगी इमारत भाडेतत्वावर घेण्यास तसेच त्याकरिता रुपये १,२५,३८६/- मासिक एवढ्या भाड्यापोटी येणा-या खर्चास विभागाच्या संदर्भ क्र. ४ वरील दिनांक ०४.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर प्रशासकीय मान्यतेनुसार इमारत मालक श्री. अनिल जैन व संस्थेचे तत्कालिन अधिष्ठाता यांच्यामध्ये ११ महिन्यांसाठी (दिनांक ०५.०३.२०२२ ते दिनांक ०४.०२.२०२३) करार करण्यात आला होता. सदर कराराची मुदत दिनांक ०४.०२.२०२३ रोजी समाप्त झाली आहे.

२. राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगांच्या मानकांनुसार उक्त संस्थेत प्रवेशित विद्यार्थ्यांना वसतिगृह उपलब्ध असणे आवश्यक असून अद्याप सदर संस्थेच्या इमारतींचे बांधकाम पुर्ण झाले नसल्याची बाब विचारात घेता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदुरबार या संस्थेत प्रवेशित मुलांच्या वसतिगृहाकरीता खाजगी इमारत भाडेतत्वावर घेण्यासाठी संस्थास्तरावर करण्यात आलेल्या करारास दिनांक ०५.०२.२०२३ ते दिनांक ०४.०१.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच त्याबाबतचा रु.१,२५,३८६/-प्रति माह एवढा खर्च सदर संस्थेस सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात (१४) भाडेपट्टी व कर या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-१, अनुक्रमांक-१० अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१२१८००१७७४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.06.12 05:53:34 -07'00'

**(म. गि. जोगदंड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र,मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदुरबार.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.
६. निवडनस्ती (प्रशा-२).